**विमुक्त जाती, भटक्या जमातीच्या मुला-मुलींकरीता स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या माध्यमिक (निवासी) आश्रमशाळांना मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक:विभशा २००४/प्र.क्र.५ /मावक-६
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २७ जानेवारी,२००४

वाचा:- (१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : विभशा २००२/प्र.क्र.३९/मावक-६, दि.१५ नोव्हेंबर,२००२.
(२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : विभशा २००२/प्र.क्र.३९/मावक-६, दि.१६ ऑक्टोबर,२००३
(३) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : विभशा २००२/प्र.क्र.३९/मावक-६, दि.७ नोव्हेंबर,२००३

**शासन निर्णय** :- महाराष्ट्रातील विमुक्त जाती, भटक्या जमाती या संवर्गातील बरेच लोक आपला उदरनिर्वाह करण्यासाठी एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी भटकत असतात. त्यामुळे त्यांच्या मुलांना शिक्षणापासून वंचित राहावे लागते. या संवर्गातील मुला-मुलींसाठी सोई उपलब्ध करुन दिल्यास आणि व्यक्तीगत लक्ष दिल्यास त्यांच्या शिक्षणावर चांगला परिणाम होईल, या दृष्टीकोनातून या मुलांसाठी खास स्वतंत्र आश्रमशाळा अनुदान देऊन स्वयंसेवी संस्थांमार्फत सुरु करण्याची योजना सन १९५३-५४ पासून कार्यरत आहे. यानुसार राज्यात सन २००३-२००४ या शैक्षणिक वर्षअखेर १५७ माध्यमिक आश्रमशाळा मंजूर करण्यात आलेल्या आहेत. त्यानंतर १३५ माध्यमिक आश्रमशाळा (निवासी शाळा) सुरु करण्याचा निर्णय शासन निर्णय दि.१६ ऑक्टोबर,२००३ अन्वये घेतलेला आहे.

२. वरील निर्णयास अनुसरुन राज्यातील स्वयंसेवी संस्थांकडून माध्यमिक निवासी आश्रमशाळेला मान्यता देण्याकरिता अर्ज वृत्तपत्रात जाहिरात देऊन मागविण्यात आले होते. सदर जाहिरातीनुसार प्राप्त झालेल्या अर्जांची छाननी शासन निर्णय दिनांक ७.११.२००३ अन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरिय समिती व राज्यस्तरिय समितीमार्फत करण्यात आली. त्यानुसार संचालक, वि.जा.भ.ज., महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पाठविलेल्या प्रस्तावाचा सर्वकंष विचार करुन सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" मधील स्वयंसेवी संस्थांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी माध्यमिक (निवासी शाळा) आश्रमशाळा जून २००४-२००५ या शैक्षणिक वर्षापासून सुरु करण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर मान्यता देतेवेळी शासनाच्या दिनांक २७.९.१९९९ च्या निर्णयाप्रमाणे

ज्या संस्थांना इरादापत्रे देण्यात आली होती, त्यातील अर्ज दाखल केलेल्या व अर्ज दाखल न केलेल्या तसेच मा. उच्च न्यायालयाने ज्या संस्थांचा गुणवत्तेवर विचार करावा, असे आदेश दिलेले आहेत, अशा सर्व संस्थांचा विचार शासन निर्णय दिनांक १६.१०.२००३ मधील अटी, शर्ती व निकषांनुसार करण्यात आला आहे.

३. सदर मान्यता ही शासनाने विहित केलेल्या सोई-सुविधा उपलब्ध करुन देण्याच्या तसेच, आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या पदांना मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीची मान्यता मिळण्याच्या अटीचे अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे. संस्थेने विहित सोई-सुविधा उपलब्ध करुन दिल्याबाबतची तपासणी विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी व विभागीय समाजकल्याण अधिकारी यांचेमार्फत जून २००४ या शैक्षणिक वर्षाच्या सुरुवातीला करण्यात येईल व सदर तपासणीमध्ये विहित सोई-सुविधा उपलब्ध करुन दिल्याची खात्री झाल्यानंतरच इ.८ वी चा वर्ग सुरु करण्यास परवानगी दिली जाईल. जून,२००४ या शैक्षणिक वर्षाच्या सुरुवातीला सदर सोई-सुविधांची पूर्तता झाली नाही तर माध्यमिक निवासी शाळा शैक्षणिक वर्ष जून २००५ पासून सुरु करण्यास सोई-सुविधेच्या अधिन राहून परवानगी देण्यात येईल.

४. या योजनेच्या अनुषंगाने शासनाने वेळोवेळी काढलेले आदेश त्यातील नियम, अटी व शर्ती या संस्थेवर बंधनकारक राहतील. तसेच शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य क्र.विभशा २००२/प्र.क्र.३९/मावक-६, दि.१६ ऑक्टोबर, २००३ अन्वये विहित केलेल्या सोई-सुविधा माध्यमिक निवासी आश्रमशाळेला पुरविणे संस्थेवर बंधनकारक राहील. शासनाकडून विहित करण्यात येत असलेल्या सूत्रानुसार माध्यमिक निवासी शाळांना अनुदान अनुज्ञेय राहील व ते निधीच्या उपलब्धतेनुसार देण्यात येईल. तसेच वेळोवेळी अनुदानात बदल होईल तो बंधनकारक राहील. संस्थेच्या निवासी माध्यमिक शाळेची तपासणी त्रयस्त यंत्रणेमार्फत करण्यात येईल व त्यांच्यामध्ये अनियमितता व त्रुटी आढळल्यास प्रकरणाच्या स्वरुपानुसार फौजदारी गुन्हे दाखल करणे, शाळा बंद करणे, अनुदानात कपात करणे व दंड करणे इ. कारवाई करण्यात येईल. सदर निवासी शाळेवर अर्हताप्राप्त तसेच अनुशेषानुसार शिक्षकांची नियुक्ती करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

५. मंजूर करण्यात आलेल्या सदर माध्यमिक निवासी शाळांचा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा :-

" २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण- ०३ - मागासवर्गीयांचे कल्याण- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-(०१)(०२) स्वयंसेवी संस्थांना आश्रमशाळा व मुलोद्योगोतर आश्रमशाळा चालविण्यासाठी सहाय्यक अनुदाने (२२२५ ०७६ २)- ४१ सहाय्यक अनुदाने "

५. संचालक,वि.जा.भ.ज.पुणे यांना याबाबत आहरणव संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

वैअपारकर

**( वै.अ.पारकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, महाराष्ट्र राज्य,पुणे
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य,पुणे
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
विभागीय उप संचालक, लेखा व कोषागारे
सर्व जिल्हा कोषागार अधिकार
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, नागपूर
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व शिक्षण उप संचालक
सर्व शिक्षणाधिकारी
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री,वि.जा.भ.ज. यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री,वि.जा.भ.ज. यांचे खाजगी सचिव
अध्यक्ष / सचिव, वरील सर्व संबंधित
निवड नस्ती - मावक-६

# परिशिष्ट "अ"

**शासन निर्णय क्रमांक-विभशा-२००४/प्र.क्र.५/मावक-६, दिनांक २७ जानेवारी, २००४ चे सहपत्र.**

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | माध्यमिक (निवासी) आश्रमशाळेचे ठिकाण |
|---|---|---|
| | **जिल्हा - पुणे** | |
| १ | हिंदुस्थान शिक्षण संस्था, सोनवडी, ता.दौंड, जि. पुणे. | मोरेवस्ती, कुरकुंभ रोड, ता. दौंड, जि. पुणे. |
| | **जिल्हा - अहमदनगर** | |
| २ | धन्वंतरी मेडिकल ॲण्ड एज्युकेशनल फौंडेशन, नालेगांव, ता. पारनेर, जि. अहमदनगर. | ढवळपूरी, ता. पारनेर, जि. अहमदनगर. |
| | **जिल्हा - सोलापूर** | |
| ३ | सोलापूर जिल्हा मागास सेवा मंडळ, ता. उत्तर सोलापूर, जि. सोलापूर. | पाकणी, ता. उत्तर सोलापूर, जि. सोलापूर. |
| ४ | गितांजली शिक्षण प्रसारक मंडळ, रुध्देवाडी, ता. अक्कलकोट, जि. सोलापूर. | रुध्देवाडी, ता. अक्कलकोट, जि. सोलापूर. |
| ५ | श्री.शिवशक्ती शिक्षण प्रसारक मंडळ, ता. माढा, जि. सोलापूर. | टेंभूर्णी, ता. माढा, जि. सोलापूर. |
| ६ | शिवाजी ग्राम विकास मंडळ, खामगाव, ता. बार्शी, जि. सोलापूर. | खामगाव, ता. बार्शी, जि. सोलापूर. |
| ७ | शाहू शिक्षण संस्था, पंढरपूर, जि. सोलापूर. | पडोळकरवाडी, ता. मंगळवेढा, जि. सोलापूर. |
| ८ | मागास समाज सेवा मंडळ, नेहरुनगर, सोलापूर. | जामगाव बु., ता. मोहोळ, जि. सोलापूर. |
| ९ | श्री.लक्ष्मी शिक्षण प्रसारक मंडळ, डिकसळ, ता. सांगोला, जि. सोलापूर. | डिकसळ, ता. सांगोला, जि. सोलापूर. |
| १० | गुरुदेव शिक्षण प्रसारक मंडळ, विंचूर, ता. द .सोलापूर, जि. सोलापूर. | शंकरनगर, विंचूर, ता. द.सोलापूर, जि. सोलापूर. |
| ११ | शिवालय शिक्षण व क्रीडा प्रसारक मंडळ, सोलापूर. | तळेहिप्परगा, ता. उ. सोलापूर, जि. सोलापूर. |
| १२ | श्री.शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ, केवड, ता. माढा, जि. सोलापूर. | केवड, ता. माढा, जि. सोलापूर. |
| १३ | जय जगदंबा बहुउददेशिय संस्था, सर्जापूर, ता. बार्शी, जि. सोलापूर. | जामगाव, ता. माढा, जि. सोलापूर. |
| १४ | जय कालिका माता शिक्षण प्रसारक मंडळ, पानगाव, ता. बार्शी, जि. सोलापूर. | वैराग, ता. बार्शी, जि.सोलापूर. |

| | | |
|---|---|---|
| १५ | कै. किसनराव मागास समाज शिक्षण मंडळ, मुळेगांव तांडा, ता. द. सोलापूर, जि.सोलापूर. | मुळेगाव तांडा, ता. द. सोलापूर, जि.सोलापूर. |
| १६ | नवयुग शिक्षण सामाजिक विकास व क्रीडा मंडळ, माढा, जि. सोलापूर. | माढा, ता. माढा, जि. सोलापूर. |
| **जिल्हा - सांगली** | | |
| १७ | सिध्दार्थ शिक्षण प्रसारक मंडळ, सनमडी, ता. जत, जि. सांगली. | जत, जि. सांगली. |
| १८ | वारणा मोरणा शिक्षण संस्था, मांगले, ता. शिराळा, जि. सांगली. | कुरळप, ता. वाळवा, जि. सांगली. |
| १९ | सद्गुरु जंगली महाराज शिक्षण संस्था, कापूसखेड, ता. वाळवा, जि. सांगली. | शिराळा, ता. शिराळा, जि. सांगली. |
| **जिल्हा - सातारा** | | |
| २० | ज्ञानप्रसारक शिक्षण संस्था, सातारा. | सांगवी, ता. फलटण, जि. सातारा. |
| २१ | श्री. संत गाडगेमहाराज मिशन, मुंबई. | मुरुम सर्कल, ता. फलटण, जि. सातारा. |
| २२ | सदगुरु जंगली महाराज शिक्षण संस्था, कापूसखेड, ता. वाळवा, जि. सांगली. | शेरे, ता. कराड, जि. सातारा. |
| **जिल्हा - नासिक** | | |
| २३ | आदिवासी सेवा समिती, नासिक | गाळणे, ता. मालेगाव, जि. नासिक. |
| २४ | सरस्वती माता शिक्षण प्रसारक संस्था, सोयगाव, ता. मालेगाव, जि. नासिक. | वडनेर, ता.मालेगाव, जि. नासिक. |
| २५ | ग्रामोदय शिक्षण संस्था, नासिक. | ढेकू, ता. नांदगाव, जि. नासिक. |
| २६ | श्रीराम मित्र मंडळ, नासिक. | रामनगर, ता. सिन्नर, जि. नासिक. |
| २७ | समाज सुधार समिती, नासिक. | म्हसरुळ, ता. जि. नासिक. |
| **जिल्हा - धुळे** | | |
| २८ | कै. वसंतराव नाईक शिक्षण प्रसारक मंडळ, मोरदडतांडा, ता. जि. धुळे. | मोरदडतांडा, ता. जि. धुळे. |
| २९ | जन जागत शिक्षण प्रसारक संस्था, दोंडाईचा, ता. सिंदखेडा, जि. धुळे. | दोंडाईचा, ता. सिंदखेडा, जि. धुळे. |
| ३० | लोकमान्य एज्युकेशन सोसायटी, ता. जि. धुळे. | वर्षी, ता. सिंदखेडा, जि. धुळे. |
| **जिल्हा - जळगाव** | | |
| ३१ | मथुराई शिक्षण संस्था, चाळीसगांव, जि. जळगाव. | तळवण तांडा, ता. भडगांव, जि. जळगांव. |
| ३२ | नर्मदा शिक्षण प्रसारक मंडळ, जळगाव, २९ रामपेठ, जि. जळगाव. | केकत निंबोरा, ता. जामनेर, जि. जळगाव. |

| | | |
|---|---|---|
| ३३ | बहुउददेशिय शिक्षण प्रसारक मंडळ, गडखांब, पो. नगाव, ता. अमळनेर, जि. जळगावं. | गडखांब, पो. नगाव, ता. अमळनेर, जि. जळगांव. |
| ३४ | राष्ट्रीय सहकारी शिक्षण प्रसारक मंडळ, चाळीसगांव, जि. जळगाव. | लोणजे, ता. चाळीसगांव, जि. जळगांव. |
| **जिल्हा - नंदूरबार** | | |
| ३५ | इंदिरा महिला सेवा सोसायटी , नंदूरबार. | नांदर्खे, ता. जि. नंदूरबार. |
| ३६ | काठोबादेव शिक्षण प्रसारक मंडळ, अक्राळे, ता. जि. नंदूरबार. | अक्राळे, ता. जि. नंदूरबार. |
| **जिल्हा - अकोला** | | |
| ३७ | जनता ज्ञानोपासक मंडळ, लोहगड, ता. बार्शीटाकळी, जि. अकोला. | साखरविरा, ता. बार्शीटाकळी, जि. अकोला. |
| ३८ | स्वामी विवेकानंद शिक्षण प्रसारक मंडळ, झरंडी, ता. पातूर, जि. अकोला. | झरंडी, ता. पातूर, जि. अकोला. |
| **जिल्हा - अमरावती** | | |
| ३९ | प्रियदर्शनी बहुउददेशिय संस्था, मोझरी, ता. तिवसा, जि. अमरावती . | भारवाडी (नवीन), ता. तिवसा, जि. अमरावती. |
| ४० | विद्या भारती शैक्षणिक मंडळ, सी. के. नायडू रोड, कॅम्प अमरावती, जि. अमरावती. | चंद्रपूर (खल्लार), ता. दर्यापूर, जि. अमरावती. |
| **जिल्हा - यवतमाळ** | | |
| ४१ | छत्रपती शिवाजी प्राथमिक शिक्षण कृषि व ग्राम विकास प्रतिष्ठान,शिवपुरी, जि. यवतमाळ | शिवपुरी, ता. कळंब, जि. यवतमाळ. |
| ४२ | स्व. श्री.राजेश्वरराव बेलूरकर ग्रामीण विकास प्रतिष्ठान, बेलोरा, जि. यवतमाळ. | खापरी, ता. घाटंजी, जि. यवतमाळ. |
| ४३ | स्व. मोतीराम नाईक शिक्षण संस्था, विठाळा, ता. दिग्रस, जि. यवतमाळ. | तिवरी, ता. दिग्रस, जि. यवतमाळ. |
| ४४ | मागासवर्गीय एज्युकेशन सोसायटी, पुसद, जि. यवतमाळ. | काळी (दौ), ता. महागाव, जि. यवतमाळ. |
| ४५ | शंकर शिक्षण व क्रीडा प्रसारक मंडळ, रुईतलाव, ता. दिग्रस, जि.यवतमाळ. | रुईतलाव, ता. दिग्रस, जि. यवतमाळ. |
| ४६ | प्रियदर्शनी शिक्षण संस्था, आमनी, ता. महागाव, जि. यवतमाळ. | आमनी, ता. महागाव, जि. यवतमाळ. |
| ४७ | अरुणावती शिक्षण प्रसारक मंडळ, हेटी येरमल, ता. आर्णी, जि. यवतमाळ | हेटी येरमल, ता. आर्णी, जि. यवतमाळ. |
| ४८ | विघ्नहर्ता ग्रामीण विकास संस्था, यवतमाळ. | डोंगरखर्डा, ता. कळंब, जि. यवतमाळ. |

| | | |
|---|---|---|
| ४९ | नवदुर्गा शिक्षण प्रसारक मंडळ, पुसद, ता. पुसद, जि. यवतमाळ. | सावरगांव बंगला, ता. पुसद, जि. यवतमाळ. |
| ५० | तपस्वी रामसिंगबाबा कुलदैवत शिक्षण संस्था, गहुली येरंडा, ता. पुसद, जि. यवतमाळ. | येरंडा, ता. पुसद, जि. यवतमाळ. |
| ५१ | फुलसिंग नाईक शिक्षण प्रसारक मंडळ, गहुली, ता. पुसद, जि. यवतमाळ. | गहुली, ता. पुसद, जि. यवतमाळ. |
| **जिल्हा - बुलढाणा** | | |
| ५२ | भारत जनकल्याण सहयोग केंद्र, बुलढाणा. | पिंपळगाव काळे, ता. जळगाव जामोद, जि. बुलढाणा. |
| ५३ | श्री.वसंतराव नाईक शिक्षण संस्था, पळसखेड नागो, ता. जि.बुलढाणा | पळसखेड नागो, ता. जि. बुलढाणा. |
| **जिल्हा - नागपूर** | | |
| ५४ | इंदिरास्मृती मानव सेवा समाज संस्था, नागपूर | बुट्टीबोरी, जि. नागपूर. |
| ५५ | नवशक्ती एज्युकेशन ॲण्ड कल्चरल सोसायटी, आगरगाव, ता. हिंगणा, जि. नागपूर. | पुसागोंदी, ता. काटोल, जि. नागपूर. |
| **जिल्हा - वर्धा** | | |
| ५६ | अभिव्यक्ती सर्वांगिण विकास संस्था, हिंगणघाट, जि. वर्धा. | वडनेर, ता. हिंगणघाट, जि. वर्धा. |
| **जिल्हा - गडचिरोली** | | |
| ५७ | विनायक शिक्षण संस्था, विसोरा, ता. देसाईगंज, जि. गडचिरोली. | कोकडी, ता. देसाईगंज, जि. गडचिरोली. |
| **जिल्हा - चंद्रपूर** | | |
| ५८ | धनाजी नाईक शिक्षण प्रसारक मंडळ, स्नेहनगर, गजानन मंदिर रोड, जि. चंदपूर. | बरांजतांडा, ता.भद्रावती, जि. चंद्रपूर. |
| **जिल्हा - गोंदिया** | | |
| ५९ | जय अंबे शिक्षण संस्था, तुमसर, जि. भंडारा | दवणीवाडा, ता. तिरोडा, जि. गोंदिया. |
| ६० | लंजे शिक्षण संस्था, फुटाळा, ता. सडक अर्जूनी, जि. गोंदिया. | सडक अर्जूनी, जि. गोंदिया. |
| ६१ | आदर्श कल्याणकारी शिक्षण संस्था, गोरेगाव (घोटी), ता. गोरेगाव, जि. गोंदिया. | घोटी (गोरेगांव), ता. गोरेगाव, जि. गोंदिया. |
| **जिल्हा - औरंगाबाद** | | |
| ६२ | कै. गुरुदयालसिंग राठोड मागासवर्गीय शिक्षण संस्था, ब्राम्हणी गराडा, ता. कन्नड, जि. औरंगाबाद. | ब्राम्हणी गराडा, ता. कन्नड, जि. औरंगाबाद. |

| | | |
|---|---|---|
| ६३ | नवजीवन शिक्षण प्रसारक मंडळ, अंबातांडा, ता. कन्नड, जि. औरंगाबाद. | अंबातांडा, ता. कन्नड, जि. औरंगाबाद. |
| ६४ | मातोश्री तुलसी शिक्षण प्रसारक मंडळ, सिल्लोड, ता. सिल्लोड, जि. औरंगाबाद. | जटवाडा, ता. जि. औरंगाबाद. |
| ६५ | स्वप्नपूजा शिक्षण संस्था, संदेशनगर, गारखेडा परिसर, औरंगाबाद. | वेरुळ तांडा, ता. खुलताबाद, जि. औरंगाबाद. |
| ६६ | कमला नेहरु शिक्षण संस्था, औरंगाबाद. | बोकूड जळगांव, ता. पैठण, जि. औरंगाबाद. |
| **जिल्हा - बीड** | | |
| ६७ | माता धरमणी भटक्या विमुक्त शिक्षण प्रसारक व महिला मंडळ, संस्था, वसंतनगर, पाचेगाव, ता. गेवराई, जि. बीड. | पाचेगाव, ता. गेवराई, जि. बीड. |
| ६८ | सुशिल शिक्षण संस्था, बीड. | गेवराई, ता. गेवराई, जि. बीड. |
| ६९ | राजमाता शिक्षण प्रसारक मंडळ, डोईठाणा, ता. आष्टी, जि. बीड. | मराठवाडी तांडा, ता. आष्टी, जि. बीड. |
| ७० | श्री. संत विठ्ठलेश्वर शिक्षण प्रसारक मंडळ, थर्मलरोड, परळी, जि. बीड. | अंबाजोगाई, जि.बीड. |
| **जिल्हा - हिंगोली** | | |
| ७१ | वसंत शिक्षण संस्था, पो. रामेश्वर तांडा, ता. कळमनुरी, जि. हिंगोली. | वरुड तांडा, ता. कळमनुरी, जि. हिंगोली. |
| ७२ | नेहा महिला मंडळ, जनार्दन नगर, नांदेड. | बाभुळगाव, ता. सेनगाव, जि. हिंगोली. |
| ७३ | छत्रपती शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ, जवळाबाजार, ता. औंढा नागनाथ, जि. हिंगोली. | जवळाबाजार, ता. औंढा नागनाथ, जि. हिंगोली. |
| **जिल्हा - परभणी** | | |
| ७४ | वाल्मिकी शिक्षण प्रसारक मंडळ, परभणी | वालूर, ता. सेलू, जि. परभणी. |
| ७५ | श्री.सेवादास शिक्षण प्रसारक मंडळ, मालेवाडी, ता. गंगाखेड, जि. परभणी. | मालेवाडी तांडा, ता. गंगाखेड, जि. परभणी. |
| ७६ | मराठवाडा सार्वजनिक शिक्षण प्रसारक मंडळ, चाटोरी, ता. पालम, जि. परभणी. | मोजमाबाद तांडा, जि. परभणी. |
| ७७ | वसंतराव नाईक शिक्षण प्रसारक मंडळ, ता. गंगाखेड, जि. परभणी. | सुरळवाडी, ता. गंगाखेड, जि. परभणी. |
| ७८ | नरोत्तम शिक्षण प्रसारक मंडळ, चारठाणा, ता. जिंतूर, जि. परभणी. | चारठाणा, ता. जिंतूर, जि. परभणी. |
| ७९ | महात्मा फुले विद्यार्थी वसतिगृह, वडवळ (ना), ता. अहमदपूर, जि. लातूर. | राणी सावरगाव, ता. गंगाखेड, जि. परभणी. |

| | | |
|---|---|---|
| ८० | इंदिरा शिक्षण प्रसारक मंडळ, चितनेरवाडी, ता. जिंतूर, जि. परभणी. | गडदगव्हाण तांडा, ता. जिंतूर, जि. परभणी. |
| ८१ | सुर्योदया सेवाभावी संस्था, बनवस, ता. पालम, जि. परभणी. | बनवस, ता. पालम, जि. परभणी. |
| | **जिल्हा - उस्मानाबाद** | |
| ८२ | श्री.वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, घाटंग्री, जि. उस्मानाबाद. | घाटंग्री, जि. उस्मानाबाद. |
| ८३ | महात्मा फुले शिक्षण प्रसारक मंडळ, जळकोट, ता. तुळजापूर, जि. उस्मानाबाद. | होर्टी, ता. तुळजापूर, जि. उस्मानाबाद. |
| ८४ | अहिल्यादेवी विद्या विकास शिक्षण प्रसारक मंडळ, रत्नापूर, ता. परांडा, जि. उस्मानाबाद. | नळी, ता. भूम, जि. उस्मानाबाद. |
| ८५ | महाराष्ट्र विमुक्त जाती शिक्षण संस्था, होळी, ता. लोहारा, जि. उस्मानाबाद. | होळी, ता.लोहारा, जि. उस्मानाबाद. |
| ८६ | लाल बहादूर मागास समाज सेवा मंडळ, उमरगा, जि. उस्मानाबाद. | नाईकनगर, सुंदरवाडी, ता. उमरगा, जि. उस्मानाबाद. |
| | **जिल्हा - नांदेड** | |
| ८७ | जगदीश शिक्षण प्रसारक मंडळ, दाबदरी, ता. हिमायतनगर, जि. नांदेड. | पोटा बु., ता. हिमायतनगर, जि. नांदेड. |
| ८८ | भाग्योदय बहुउद्देशिय शिक्षण संस्था, असर्जन, जि. नांदेड. | पळसा, ता. हदगाव, जि. नांदेड. |
| ८९ | कै. वसंतराव नाईक शिक्षण प्रसारक मंडळ, सकनूरतांडा, ता. मुखेड, जि. नांदेड. | सकनूर तांडा, ता. मुखेड, जि. नांदेड |
| ९० | पुष्पावती शिक्षण प्रसारक मंडळ, नांदेड. | विठ्ठलनगर लोहा, जि. नांदेड. |
| | **जिल्हा - जालना** | |
| ९१ | वसंतराव नाईक शिक्षण व आरोग्य संशोधन प्रतिष्ठान, उमरी, ता. भोकर, जि. नांदेड. | तुपेवाडी, जि. जालना. |
| | **जिल्हा - लातूर** | |
| ९२ | अहिल्याबाई होळकर शिक्षण प्रसारक मंडळ, कारेपूर, ता. चाकूर, जि. लातूर. | जानवळ, ता. चाकूर, जि. लातूर. |
| ९३ | तिरुपती शिक्षण प्रसारक मंडळ, हिप्परगा, ता. अहमदपूर, जि. लातूर. | तुळशीराम तांडा, ता. अहमदपूर, जि. लातूर. |
| ९४ | ज्ञानोदय विमुक्त जाती शिक्षण प्रसारक मंडळ, कानडी बोरगाव, जि. लातूर. | कानडी बोरगाव, जि. लातूर. |

| | | |
|---|---|---|
| ९५ | आनंदराव नाईक शिक्षण प्रसारक मंडळ, देवताळा, ता. औसा, जि. लातूर. | सत्तधरवाडी, ता. औसा, जि. लातूर. |

वैभपारकर

***(वै. अ. पारकर)***

***उपसचिव, महाराष्ट्र शासन***